**श्री.प्रसेनजित ज्ञानेश कार्लेकर, प्रशिक्षणार्थी कक्ष अधिकारी - गट ब ( सीपीटीपी ३ ) यांचा परिविक्षाधीन कालावधी वाढवून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : टिआरएन ०७१८/प्र.क्र. ५६ / सीपीटीपी-ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ३१ जुलै , २०१८

**वाचा : १ ) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्रमांक सीसीएम २८८६ / २२ / ८६ / चौदा-ब , दिनांक १७ मे १९८९.**
**२ ) सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २३१७/प्र.क्र.३३/कार्यासन १७, दिनांक १७ नोव्हेंबर,२०१७.**
**३ ) सामान्य प्रशासन विभाग कार्यालयीन आदेश क्रमांक टिआरएन -०४१६/प्र.क्र ६५/ १६/१८-ब, दिनांक ०४.०८.२०१६.**

**शासन आदेश :-**

संदर्भाधीन अनुक्रमांक ३ येथील कार्यालयीन आदेशानुसार श्री.प्रसेनजित ज्ञानेश कार्लेकर, प्रशिक्षणार्थी कक्ष अधिकारी - गट ब ( सीपीटीपी ३ ) यांना कक्ष अधिकारी गट ब या पदावर नियुक्ती देण्यात आलेली आहे. मंत्रालयीन कक्ष अधिकारी गट ब पदाच्या संदर्भाधीन अनुक्रमांक १ येथील सेवाप्रवेश नियमातील नियम ५ नुसार कक्ष अधिकारी पदावर नामनिर्देशनाव्दारे नियुक्त झालेली व्यक्ती दोन वर्षाच्या कालावधीसाठी परिविक्षाधीन राहील व या कालावधीत शासनाकडून त्याबाबतीत विहित करण्यात येईल असे प्रशिक्षण घेईल व विहित विभागीय परीक्षा उत्त्तीर्ण होईल, परंतु अशा परीक्षांमध्ये जी व्यक्ती उत्तीर्ण झालेली नसेल त्या व्यक्तीचा परिविक्षाधीन कालावधी एक वर्षापेक्षा अधिक नसेल एवढया कालावधीसाठी वाढविता येईल अशी तरतूद आहे.

२. संदर्भाधीन अनुक्रमांक २ येथील शासन परिपत्रकानुसार दरवर्षी आयोजित करण्यात येणारी विभागीय परीक्षा ही या परीक्षेला बसण्यासाठी पात्र असलेल्या उमेदवारांना देण्यात आलेली संधी असते. विभागामार्फत आयोजित होणारी विभागीय परीक्षा हीच संधी म्हणून गणण्यात येते. त्यामुळे एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम - ३ ( सीपीटीपी-३ ) अंतर्गत नियुक्त झालेले श्री.कार्लेकर प्रशिक्षणार्थी कक्ष अधिकारी हे सन २०१६ मध्ये आयोजित विभागीय परीक्षेमध्ये अनुपस्थित असले तरी त्यांची सदर परीक्षेची अनुपस्थिती ही एक संधी म्हणून गणण्यात येणार

आहे. तसेच श्री. कार्लेकर हे सन २०१७ मधील आयोजित विभागीय परीक्षेमध्ये अनुत्तीर्ण झालेले आहेत, अशा प्रकारे श्री.कार्लेकर यांनी विभागीय परीक्षेसाठी दोन संधी उपभोगलेल्या आहेत, ही बाब विचारात घेता श्री. कार्लेकर यांना विभागीय परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी आणखी एक संधी उपलब्ध करुन देण्यासाठी संदर्भाधीन अनुक्रमांक १ येथील सेवाप्रवेश नियमातील नियम ५ नुसार श्री. कार्लेकर यांचा परिविक्षाधीन कालावधी एक वर्षासाठी वाढविण्यात येत आहे. सदर एक वर्षाच्या वाढीव कालावधीत श्री. कार्लेकर हे कक्ष अधिकारी पदासाठीची विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास श्री.कार्लेकर हे संदर्भाधीन अनुक्रमांक १ येथील सेवाप्रवेश नियमातील नियम ५ मधील परंतुकानुसार कक्ष अधिकारी पदावरुन मुक्त करण्यास पात्र ठरतील.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७३१११२१२७१८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vilas Ramdas Thakur
Date: 2018.07.31 11:24:53 +05'30'

(वि.रा.ठाकूर)
उप सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक.
२. प्रधान सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.
३. प्रधान सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे)
४. सह सचिव (कार्यासन १४ ब) , सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
५. उप सचिव / सह सचिव (सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, धरमपेठ, नागपूर ४४००१०.
७. श्री.प्रसेनजित ज्ञानेश कार्लेकर, प्रशिक्षणार्थी कक्ष अधिकारी - गट ब (सीपीटीपी ३)
८. निवड नस्ती
९. वैयक्तिक नस्ती

***